वसंतराव नाईक तांडा वस्ती सुधार योजनेंतर्गत सन २०२४-२५ करीता परभणी जिल्ह्यातील कामांना प्रशासकीय मान्यता व निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : तांसुयो-२०२५/प्र.क्र.५७/योजना-५**
मोती महल, २ रा मजला,
जे. टाटा रोड, चर्चगेट, मुंबई - ४०० ०२०.
दिनांक : २८ मार्च, २०२५

**वाचा :-** १) शासन निर्णय, विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग, क्रमांक: तांसुयो-२०१७/प्र.क्र.८४/योजना-१, दि.३०.०१.२०१८.
२) शासन निर्णय क्रमांक : तांसुयो-२०२४/प्र.क्र.५५६ (भाग-१), योजना-१, दिनांक १५.१०.२०२४.
३) जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, वसंतराव नाईक तांडा वस्ती सुधार योजना, परभणी यांचे क्रमांक ४४१९, दिनांक २७.०७.२०२३ व क्रमांक ०५, दिनांक ०२.०१.२०२४ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

वसंतराव नाईक तांडा वस्ती सुधार योजनेंतर्गत संदर्भ क्रमांक २ येथील दिनांक १५.१०.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये परभणी जिल्ह्यातील १७ कामांना प्रशासकीय मान्यता व सदरहू कामांकरीता एकूण रु.२.०० कोटी इतक्या निधीस मंजुरीबाबतचा आदेश निर्गमित करण्यात आला होता. तथापि, विधानसभा सार्वत्रिक निवडणूक, २०२४ च्या अनुषंगाने लागू झालेल्या आदर्श आचारसंहितेच्या पार्श्वभूमीवर सदरहू आदेश शासनाच्या संकेतस्थळावर प्रसिद्ध (अपलोड) करता आला नाही. सदरहू शासन निर्णय पुन:निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वसंतराव नाईक तांडा वस्ती सुधार योजनेंतर्गत जिल्हास्तरीय समितीने संदर्भ क्रमांक ३ येथील प्रस्तावांन्वये शिफारस केलेल्या परभणी जिल्ह्यातील १७ कामांना (परिशिष्ट-अ प्रमाणे) प्रशासकीय मान्यता व त्यांकरीता एकूण रु.२,००,००,०००/- ( अक्षरी रुपये दोन कोटी फक्त) इतका निधी वितरीत करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांक- इमाव-२००३/ प्र.क्र. २०५/मावक-३, दिनांक ७ जून, २००३ मध्ये नमूद केलेल्या तसेच, शासनाने यासंबंधी वेळोवेळी दिलेले आदेश / परिपत्रकाप्रमाणे सन २०२४-२५ मध्ये मंजुर करण्यात आलेल्या तरतूदीतून खर्च करण्यात यावा.

३. याद्वारे मंजूरी देण्यात येत असलेली परिशिष्ट-अ मध्ये नमूद कामे शासनाच्या किंवा स्थानिक स्वराज्य संस्थांच्या किंवा आमदार/खासदार किंवा अन्य कोणत्याही योजनेतून यापूर्वी मंजूर झाली नाहीत किंवा करण्यात आली नाहीत याची खात्री करुन सुरु करण्यात यावीत.

४. सोबत जोडलेल्या परिशिष्ट-अ मधील कामांचे सविस्तर अंदाजपत्रक तयार करुन त्याला सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता घेण्यात यावी.

५. सदरहू कामांकरीता संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे हे "नियंत्रक अधिकारी" म्हणून काम पाहतील. तसेच, कामांकरीता उपलब्ध करुन दिलेला निधी त्याच उद्दिष्टासाठी खर्च करण्यात येत असल्याचे व काम गुणवत्तेनुसार झाले आहे किंवा कसे, तसेच मंजूर करण्यात आलेला निधी मंजूर कामावरच खर्च झाला आहे किंवा कसे हे संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांनी पहावे.

६. याद्वारे मंजूर कामांवर निधी खर्च करतांना तो विहित कार्यपध्दतीनुसार करण्यात यावा. निधी खर्च करण्याबाबत वित्त विभागाकडून वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयातील सूचनांचा व वित्तीय अधिकाराच्या मर्यादेचा भंग होणार नाही तसेच, कुठल्याही शासन निर्णय / अधिकारांचा भंग होणार नाही हे संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांनी पहावे.

७. सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण व समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी यांचे या कामांवर प्रत्यक्ष नियंत्रण राहील व ते या कामाच्या प्रगतीचा अहवाल संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांना व शासनास न चुकता सादर करतील.

८. सदर निधी वितरीत करण्यासाठी उप सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय मुंबई यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून तसेच सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, परभणी यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, सदरहू निधी कोषागारातून आहरित करण्यासाठी सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, परभणी यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी याबाबत महालेखापाल कार्यालयाशी ताळमेळ करुन त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

९. यावरील खर्च "मागणी क्र.झेडजी-३, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ८०-सर्वसाधारण, १०२-स्वयंसेवी संस्थांना मदत, (०२) तांडा वस्ती सुधार योजना,(०२)(०१) विजाभज आणि विमाप्र यांच्यासाठी तांडा वस्ती सुधार योजना (कार्यक्रम), ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेतर) (कार्यक्रम) (दत्तमत) (२२२५ एफ ०५८)" या लेखाशिर्षांतर्गत २०२४-२५ या वर्षात उपलब्ध आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२८१९११००५२३४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन पुन:निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by RAVINDRA RAMDAS PETKAR
Date: 2025.03.28 19:12:14 +05'30'

**( र.रा.पेटकर )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा. उप मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
११. जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, वसंतराव नाईक तांडा/वस्ती सुधार योजना, परभणी.
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी.
१३. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
१४. महालेखापाल महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर.
१५. उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग (प्रादेशिक), छ.संभाजीनगर.
१६. सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, परभणी.
१७. जिल्हा समाजकल्याण अधिकारी, परभणी.
१८. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी.
१९. लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा व निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
२०. उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. उप सचिव (का-१४१३) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. उप सचिव (व्यय-१४) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२४. निवडनस्ती (योजना-१).

**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : तांसुयो-२०२५/प्र.क्र.५७/योजना-५**
दिनांक : २८ मार्च, २०२५.

**परिशिष्ट-अ**

वसंतराव नाईक तांडा वस्ती सुधार योजनेंतर्गत सन २०२४-२५ करीता प्रशासकीय मान्यता देण्यात येत असलेल्या **परभणी** जिल्ह्यातील कामांचा तपशील

(रु. लक्षमध्ये)

| अ. क्र. | तालुका | ग्रामपंचायतीचे नाव | तांडा/ वस्तीचे नाव व लोकसंख्या | कामाचे स्वरुप | कामाची किंमत |
|---|---|---|---|---|---|
| १ | परभणी | बाभुळगाव | खंडोबा नगर (२०४) | समाजमंदिर बांधकाम करणे | २५.०० |
| २ | | बाभुळगाव | मल्हार नगर (२५५) | नाली बांधकाम व सोलार लाईट बसविणे | १५.०० |
| ३ | | झाडगाव | वैदु वस्ती (१३०) | सी.सी.रोड बांधकाम करणे | १०.०० |
| ४ | | उखळद | जुमडे नगर (१८३) | विद्युतीकरण करणे | १०.०० |
| ५ | | उखळद | नरवाडे नगर (१५३) | विद्युतीकरण करणे | १०.०० |
| ६ | | उखळद | वैद्य नगर (१८०) | विद्युतीकरण करणे | १०.०० |
| ७ | | उखळद | मात्रे नगर (२००) | विद्युतीकरण करणे | १०.०० |
| ८ | | जांब | अहिल्याबाई होळकर नगर (२००) | सी.सी.रोड बांधकाम करणे | १०.०० |
| ९ | | मिरखेल | अहिल्याबाई होळकर नगर (६५) | सी.सी.रोड बांधकाम करणे | १०.०० |
| १० | गंगाखेड | चिलगर वाडी | अहिल्याबाई गल्ली-होळकर नगर (२८१) | एल.ई.डी. विद्युतीकरण करणे | २०.०० |
| ११ | गंगाखेड | मालेवाडी | मालेवाडी तांडा (५७०) | एल.ई.डी. विद्युतीकरण करणे | १०.०० |
| १२ | | मालेवाडी | हटकर गल्ली (१४७) | एल.ई.डी. विद्युतीकरण करणे | १०.०० |
| १३ | | कौडगाव | धरम नगरी / धनगर वस्ती (८००) | सोलार लाईट बसविणे | १०.०० |
| १४ | | मसनेरवाडी | मल्हार वस्ती (२००) | पाणीपुरवठा करणे | १०.०० |

| अ. क्र. | तालुका | ग्रामपंचायतीचे नाव | तांडा/ वस्तीचे नाव व लोकसंख्या | कामाचे स्वरुप | कामाची किंमत |
|---|---|---|---|---|---|
| १५ | | मसनेरवाडी | यशवंतराव होळकर नगर (३००) | सी.सी.रोड व नाली बांधकाम करणे | १०.०० |
| १६ | पालम | रोकडेवाडी | अहिल्याबाई नगर (५४१) | विद्युतीकरण करणे | १०.०० |
| १७ | जिंतूर | चिंचोली दराडे | भगवानबाबा नगर (५००) | सी.सी.रोड व नाली बांधकामा करणे | १०.०० |
| | | | **एकूण** | | **२००.००** |

Digitally signed by RAVINDRA RAMDAS PETKAR
Date: 2025.03.28 19:12:45 +05'30'

**(र.रा.पेटकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**